महाराष्ट्र राज्यात वन वणवा आटोक्यात
आणण्याच्या आधुनिक पध्दती
सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात अनुदान
उपलब्ध करुन देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग,
## शासन निर्णय क्र. एफडीसी-२०१६/प्र.क्र.५३/फ-५

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०८ मार्च, २०१७

**संदर्भ:** १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६ / प्र.क्र.८९/ अर्थ-३ दि.२०/४/२०१६
२) व्यवस्थापकीय संचालक, एफडीसीएम लि. नागपूर यांचे पत्र क्र. एफअे/आववप्रप/चालू योजना/ २०१६-१७/ ९४९ दि.२३ जुन, २०१६
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२ (१)/असं/प्रक्र.१७/३२५/२०१६-१७ दि. १५/१०/२०१६
४) शासन निर्णय क्र. एफडीसी-२०१६/ प्र.क्र.५३/फ-५, दि.२९ ऑक्टोंबर, २०१६
५) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. असंअ-२०१७ / प्र.क्र.६४/ ब-१ दि.२० फेब्रुवारी, २०१७

**प्रस्तावना:**

भारत सरकार आणि अन्न व कृषि संघटना संयुक्त राष्ट्र विकास कार्यक्रम योजनेद्वारे महाराष्ट्र राज्यातील वनवणवा आटोक्यात आणण्यासाठी व बहुमुल्य वनसंपदेचे अग्निपासून रक्षण करण्यासाठी आधुनिक वनवणवा प्रतिबंधक प्रकल्प १९८४ पासून राबविण्यात येत आहे. महाराष्ट्र वन विकास महामंडळ हा प्रकल्प सन १९८४-८५ पासून शासनाचा अभिकर्ता म्हणून राबवित आहे.

या प्रकल्पांतर्गत वनाचे अग्निपासून आधुनिक पध्दतीने संरक्षण करण्यात येत असुन मुख्यत्वेकरुन मोठया प्रमाणात लागवड केलेल्या साग रोपवनाचे रक्षण होत आहे. या प्रकल्पामुळे वनवणव्याच्या घटना व व्याप्ती यात लक्षणीय घट झाल्याचे दृष्टोत्पतीस येत आहे. योजनेचे महत्व व फलश्रुती विचारात घेता या प्रकल्पांतर्गत करावयाचे काम सन २०१६-१७ मध्ये चालू ठेवणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्यातील वनवणवा आटोक्यात आणण्यासाठी व बहुमुल्य वनसंपदेचे अग्निपासून रक्षण करण्यासाठी आधुनिक वनवणवा प्रतिबंधक प्रकल्पांतर्गत २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी रु.२११.२१ लक्षची तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे.

वित्त विभागाचे संदर्भ क्र. ५ येथील दिनांक २०/०२/२०१७ च्या परिपत्रकानुसार सन २०१६-१७ चा उर्वरीत कालावधी, वितरीत निधी व त्याचा झालेला विनियोग पहाता आता योजनेत्तर अर्थसंकल्पीत निधी खर्च करण्याची मर्यादा ९०% एवढी विहित करण्यात आली आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दिनांक २०/०४/२०१६ च्या परिपत्रकानुसार योजनेत्तर योजनांकरिता अर्थसंकल्पीत निधीच्या ८०% म्हणजे रु.१६८.९६८ लक्ष इतका निधी संदर्भ क्र ४ येथील शासन निर्णय दिनांक २९ ऑक्टोबर, २०१६ अन्वये वितरीत करण्यात आला असून, वित्त विभाग शासन निर्णय दिनांक २०/०२/२०१७ च्या परिपत्रकानुसार आता उर्वरीत १०% म्हणजे रु. २१.११२ लक्ष इतका निधी "मागणी क्रमांक सी-७ प्रधानशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) १९० सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमांना सहाय्य (००)(०१) महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्यादित यांस प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), नागपूर यांचेमार्फत देय असलेला अभिकरण खर्च (२४०६ ०६६८) ५० इतर खर्च या लेखाशिर्षा अंतर्गत निधी उपलब्ध करुन वितरीत व खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

सदरहू शासन निर्णय विभागाचे परिपत्रक क्र. असंअ-२०१७ / प्र.क्र.६४/ ब-१ दि.२०/०२/२०१७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०९१२४८०३०८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Anil N. Dhas

Digitally signed by Anil N. Dhas
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, cn=Anil N. Dhas
Date: 2017.03.09 12:47:14 +05'30'

**(अनिल धस)**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ, नागपूर
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थ संकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५. महालेखपाल (१ व २) (लेखापरिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
६. कक्ष अधिकारी, व्यय-१०, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
७. कक्ष अधिकारी, (ब-१), महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
८. कक्ष अधिकारी, (फ-२), महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
९. निवड नस्ती (फ-५), महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२